२०११०४३०१११९५३००१

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात
जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण
अभियानाअंतर्गत लहान व मध्यम शहरांतील पायाभूत
सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT) या
उपअभियानाखाली अनुदान वितरण

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्र.एनयुआर-२०११/प्रक्र-१२९/नवि-३३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक :३१मार्च,२०११**

**संदर्भ:** शा.नि. क्र. एमयुआरएम-१००७/३५६/प्र.क्र.७२/०७/नवि-३३, दिनांक १६ जुलै, २००७

**प्रस्तावना :** नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेवून केंद्र शासनाने देशातील लहान व मध्यम शहरांमध्ये पायाभूत सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी जाहिर करण्यात आलेल्या जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाचे उपअभियान (UIDSSMT) अंतर्गत महाराष्ट्रातील नगरपरिषदा यांचे शहर विकास आराखडे (CDPs) व सविस्तर प्रकल्प अहवाल (DPRs) महाराष्ट्राच्या राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या मान्यतेने केंद्र शासनास सादर करण्यात आले होते. .

उक्त योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार केंद्र शासनाने मंजूर केलेल्या प्रकल्प किमतीपैकी केंद्र शासन, राज्य शासन व महानगरपालिका/नगरपालिका यांच्या हिश्श्याचा मंजूर आकृतीबंध खालीलप्रमाणे आहे.

| UIDSSMT अंतर्गत मंजूर प्रकल्पाची एकूण किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा | राज्य शासनाचा हिस्सा | महानगरपालिका/ नगरपालिकांचा हिस्सा |
|---|---|---|---|
| १०० | (८० %) | (१० %) | (१० %) |

या योजनेअंतर्गत केंद्रीय निधी प्राप्त होण्यासाठी केंद्र शासनासोबत राज्य शासन व खालील नमूद नगरपालिकांनी सक्तीच्या व वैकल्पिक सुधारणा क्षेत्रांत प्रगती करण्याबाबत करारनामा केला आहे. हा करारनामा झाल्यानंतर केंद्र शासनाच्या नगर विकास विभागाने राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांना निधी वितरीत करण्यास शिफारस केली आहे. त्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे :-

(रु. लाखात)

| अक्र | शहर | केंद्र शासनाचा हिस्सा |
|---|---|---|
| १ | गडहिंग्लज | ३५९.२२ |
| २ | बाळापूर | २४२.०० |
| ३ | अचलपूर | १५०३.६० |

| | | |
|---|---|---|
| ४ | कुरमाळा | ३७५.९५ |
| ५ | पाचोरा | ७२७.२० |
| ६ | येवला | ४०५.०६ |
| ७ | श्रीरामपूर | १७४२.८० |
| ८ | सेलू | ४७५.६० |
| ९ | सांगोला | ८५८.०० |
| १० | हिंगोली | १८३०.७७ |
| ११ | जुन्नर | २६४.२७ |
| १२ | अंमळनेर | ९९४.८० |
| १३ | आर्वी | २९१.७२ |
| १४ | उस्मानाबाद | ४१३९.७७ |
| १५ | चंद्रपूर | २८८०.५२ |
| | **एकूण** | **१७,०११.२८** |

**शासन निर्णय :** . केंद्र शासनाच्या नगर विकास विभागाची मान्यता लक्षात घेऊन खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निधी वितरणास मंजुरी देण्यात आली आहे. सदर रकमा हया केंद्र शासनाच्या हप्त्यापोटी वितरीत करण्यात येत आहेत.

(रु.लाखात)

| अक्र | शहर | केंद्र शासनाचा हिस्सा |
|---|---|---|
| १ | गडहिंग्लज | ३५९.२२ |
| २ | बाळापूर | २४२.०० |

२.        उपरोक्त तक्त्यात नमूद  नगरपरिषदांनी त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती  पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र दिल्यानंतरच योजनेअंतर्गत केंद्र शासन व राज्य शासनाचा पुढील हिस्सा  वितरित करण्यात येईल.

०३.        केंद्र शासनाकडून  प्रत्यक्ष पाहणीद्वारे  या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेण्यात येईल.  सदर नगरपरिषदांनी दर तीन महिन्यांनी राज्यस्तरीय नोडल एजन्सीमार्फत राज्य तसेच केंद्र शासनाच्या हिश्याच्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच, केंद्र शासनास सादर करावा.

०४.        प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल  सदर नगरपरिषदेने  राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०५.        सदर महानगरपालिका/नगरपरिषदांना देण्यात येणाऱ्या **अनुदान रु. १७०,९१,२८,००० /- (रुपये एकशे सत्तर कोटी ,एक्याण्णव लाख, अठ्ठावीस हजार फक्त /-)** इतक्या रकमेचा खर्च हा मागणी क्र.  एफ-२, २२१७, नगर विकास, ८०-सर्वसाधारण, १९१- स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे, इत्यादींना सहाय्य, केंद्रसहायीत योजना, (००) (४८)  जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (२२१७१४०१), ३१- सहाय्यक अनुदाने"  या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

०६.        सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

( रा. वि. कुलकर्णी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति --

१)  महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , मुंबई
२)  महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)- २ , नागपूर
३)  संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४)  अधिदान व लेखाधिकारी, (फोर्ट) मुंबई
५)  निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६)  प्रधान सचिव, वित्त / प्रधान सचिव, नियोजन विभाग,  मंत्रालय, मुंबई
७)  आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई-३०  तथा नोडल एजन्सी
८)  कक्ष अधिकारी  (नवि-४)  नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
९)  कक्ष अधिकारी (नवि-५) रोखशाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका.
११)  निवडनस्ती (नवि-३३).